## अतिथी संपादिका

संचिता कारखानीस -डोंबिवली

## संपादक मंडळ

सोनाली घाटपांडे (पुणे)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
शशिकांत रणवरे (ठाणे)
भारती सरमळकर (मुंबई)
सचिन काकडे (मुंबई)

## मांडणी व सजावट

Last Bench Designs

## संपर्क

ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी
मॅरेथान चौक
ठाणे - ४००६००४.

☎ ९८६९६७४८२०

हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी तसेच सुचना, अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी

✉ netaksharee@gmail.com



*ई साहित्य प्रतिष्ठान तर्फ़े जागतिक महिला दिनाच्या..हार्दिक शुभेच्छा !!*



# अतिथी संपादकिय :

मी सौ. संचिता कारखानीस. ल. से. रहेजा महाविद्यालयामधून applied arts चा डिप्लोमा घेतला. व्यवसायाने (visualiesr). ठाणे येथे एका प्रथितयश जाहिरात कंपनी मध्ये कार्यरत.

आज स्वतःबद्दल चार ओळी लिहिताना एक गोष्ट प्रकर्षाने जाणवतेय ती म्हणजे सुरुवातीला फक्त छंद म्हणून जिचा हात हातात घेतला ती माझी कविता आता माझ्या आयुष्याचा एक अविभाज्य भाग बनली आहे. मी आणि माझी कविता आम्ही इतक्या एकरूप झाल्या आहोत कि तिला माझ्यापासून वेगळं करणंच आता शक्य नाही. आधी माझी कविता फक्त डायरीतच लिहिली गेली. या कवितेला जेव्हा काव्यांजलीचं व्यासपीठ मिळालं तेव्हा ती अधिकच बहरून आली. फक्त माझ्यापुरतीच स्तिमित झालेली कविता हजारो वाचकांपर्यंत जाऊन पोहोचली.

आज नेटाक्षरीसाठी अतिथी संपादिका म्हणून काम करताना मनाच्या तळ्यात सप्तरंगांचं इंद्रधनुष्य पडल्यासारखं वाटतंय. आणि त्यातून अगदी जिव्हाळ्याचा विषय हाताळायला मिळतोय तो म्हणजे 'स्त्री'.
कधी फुलाच्या पाकळीप्रमाणे हळुवार तर कधी वज्राहूनही कठोर.
कधी सखी, कधी प्रेयसी, कधी भगिनी, कधी पत्नी, कधी आई....तिच्या प्रत्येक रुपात सामावलेलं असतं एक हळवं मन. कधी जन्म देणारं...तर कधी प्रसंगी मुळासकट उपटून टाकणारं. याच स्त्रीचा वेध घेण्याचा हा छोटासा प्रयत्न.

संचिता कारखानीस.

(अतिथी संपादिका) sakhirani@gmail.com

# सख्खी....

भरकटले कधी गलबत माझे
शीडात अवखळ उधाण वारा
अशा क्षणी तू आई बनलीस
दाखविला ध्रुवाचा तारा

भय धडधडले छातीपाशी
उदासवाणी संध्याकाळ
सावरशी बोटाला धरुनी
बहीण बनूनी होशी ढाल

खडबडीत या खडकाला तू
रातराणीचा देशी गंध
भार्या बनूनी उटणे चोळीशी
सुखांस ना कुठला निर्बंध

तुझ्याविणा मी पूर्ण अधुरा
जसा कुंद वठलेला वृक्ष
चव जगण्याची दिलीस सखये
तुजविण अळणी बेचव रुक्ष

आजी, मामी, काकी, सासू
भाची, पुतणी, मैत्रीण, नात
रुपे सुखांची ईश्वर नश्वर
तूच मनाला सख्खी साथ

नाम गुम जायेगा - ठाणे
naamagumjaayegaa@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठान तर्फ़े जागतिक महिला दिनाच्या..हार्दिक शुभेच्छा !!

## मज स्त्रीपण माझे कळले

खेळले, नाचले
तुजसवे कित्तीदा
अजाण मी , कधी न मज उमजले..पण ,
मधुबनी , मन तुझे दिसता , मज स्त्रीपण माझे
कळले..

तू नेले हमरस्त्याने
आडवाट न दाखवले
मन तुझे दिसले , मी रमत रमत चालले
अन मज स्त्रीपण माझे कळले..

तू कुरवाळले सुमने
जल तरुंस पाजले
मन तुझे दिसले , मी उमलत उमलत फुलले
अन मज स्त्रीपण माझे कळले..

तू दाखवले घरटे
पाखरांस दाणे भरवले
मन तुझे दिसले , मी मोहत मोहत गुंतले
अन मज स्त्रीपण माझे कळले..

तू बागडले बालकांसवे
गाणे त्यांसी शिकवले
मन तुझे दिसले , मी लाजत लाजत हसले
अन मज स्त्रीपण माझे कळले..

तू पाहिले प्रेमाने
सांजेआत घरी पोहचवले
मन तुझे दिसले , मनोमन तुज वरले
मज स्त्रीपण माझे कळले..

स्त्रीपण माझे कळले....

स्वप्ना कोल्हे - नाशिक
only.swapna@gmail.com

## धन्य ही स्त्री

चांद कोरुन ठेवलास
कपाळाच्या सुखासाठी
रेषा तरी का पुसल्या
तिन्हीसांजा आठीसाठी

कोरड्या झाल्या घशाला
ओल दिलीस ऐनवेळी
कंबरेची पै पै मोडलीस
कितीवेळा आळीपाळी

पंखात तुझ्या बळ
येताना तर दिसत नाही
थरथर देखील पावलात
अजीबात जाणवत नाही

मोहर येता आमराईत
कोकिळा होउन गातेस
शेजारच्या दिवाळीला
अंगणाला रंगवतेस

थोरवी किती गावी तुझी
शब्द थिटे होतील माझे
हिम्मत तुझी बघुन
शाहीर पोवाडे गातील तुझे

कल्पी जोशी - नागपुर
1shubha@gmail.com

# सलाम माझा स्त्री मनाला

ती आई होऊन सांभाळी
ती बहिण होऊन ओवाळी,
ती भुषविते कुम्कुम भाळी
ती मैत्रिण मनाचिया जवळी.

ती चुकल्यावर शिक्षा देई
हरवल्यावर शोध घेई,
हळवे नाते आईचे
मधाचे बोट होई

लाडीगोडीने खुलते
हसण्या रुसण्याने फ़ुलते,
नाते असे बहिणीचे
तु तु मी मी वर झुलते

तिचा खान्दा होई विसाव्याचा
पान्घरुन होई पदराचा,
नाते अर्धान्गिणीचे
जन्मोजन्मीचे पान्ग होई

ती कवडसा मनाचा घेई
ती ध्यास होऊन जाई,
नाते हे मैत्रिणीचे
अळवावरचा मोती होई

विविध नात्यांच्या आरशातुनी
दर्पण तिचे उजळी,
सलाम माझा स्त्री मनाला
मी वाहिली शब्द सुमनांची पाकळी......

दिपक साळुंखे - पुणे
deep9960@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठान तर्फे जागतिक महिला दिनाच्या..हार्दिक शुभेच्छा !!

# स्त्री शक्तिचा एक थेंब मी........."

मी लेक, मायेत वाढून तेच बीज अंगिकारलेली...
जन्माने सुख, तर निरोपाने दुःख देणारी....

एक बहीण नाजूक, रक्षणाचे कवच मागणारी....
नि तुमच्या अश्रूंचे दान स्वतःसाठी मागणारी...

मी अल्लड प्रेयसीही, निरव्याज प्रेम करणारी...
इंद्रधनूचे रंग आयुष्यात अलगद अचूक भरणारी...

मी एक पत्नी, स्वयंपूर्ण, तरी संसारासाठी वेचलेली...
सुख-दुःखाचे पारडे समर्थ, तोल सांभाळत पेलणारी...

माता मी, कठोर तर कधी मातृत्वाने गाते अंगाई...
वकदृष्टीस आडवा वार, वाघालाही पाणी पाजणारी....

मी अबला, कधी सबला, हारते, हरून जिंकावयासी...
बुद्धी, रूप तर कधी तलवारीने रण गाजवणारी...

मी शाप, बाजार मांडूनही स्व-जातीला तारणारी...
निर्लज्जपणे का असेना पण समाज सुधारवणारीच..

मी सकारात्मक कधी नकारात्मक भूमिकेतलीही..
थांबा,............. इथे तुम्ही सर्वही आहातच की...

मी बळीही, पण ठिणगीच मी, जरी थंड असले तरी....
धग मी अफाट, विध्वंस कणा कणात गोठवलेली....

मी एक दिशा, आशा, उषा, निशा, आणि नशाही...
मी दृढ, गूढ, सूड, मी मंथनातले अमृत नि विषही...

मी कुरूप, सुरुप, स्व-रूप, आणि अ-रूपही कधी...
मी सरस्वती, दुर्गा, रेणुका, तर रणचंडीकाही कधी...

या स्त्री शक्तिचा एक थेंब मी, माझ्यामुळे हा सागर...
कशाला? हा स्त्रीशक्तिचा थांग नसलेला सागरच मी....

आता शिवालाही न पचणारे विष मी....
जरी पार्वती, तरी आता फक्त 'नारी' मी...

पण खबरदार!!!!!! लक्षात राहू द्या मंथनाचे,
आणि हो, हे मंथनही मीच......विचारांचे.....!!!

रेणुका खटावकर. - अमेरिका
renuthebest@gmail.com



# स्त्री - रूप !

चला म्हणा वा रूपगर्विता
स्वरसाम्राज्ञी अथवा राज्ञी
स्त्रीच पेलते धुरा जगाची
तीच खरी जगताची जननी !

पुष्पक येता निघुनी गेले
सन्त तुकाजी धन्य जाहले;
पोरांसाठी आवडाबाई
केरसुणी परी हाती घेई !

सती जाहणे खचित शक्यते
माद्रीपरी कुन्तीसही होते
पाच पांडवा वाढविण्याचे
ध्येय तिचे परी जागृत होते !

पांचालीला सहज शक्य ते
" नाही " म्हणणे कुंतीस होते,
महाभारताचे परी रूपडे
खचित वेगळे झाले असते.

अग्नीपरीक्षा दिली सीतेने,
केवळ पतीच्या लव आज्ञेने
शील स्त्रीयेचे चव्हाट्यावरी
" राजाने " हे उचित मानले !

स्वपात्रता ही स्त्रीयांस काही
असे समजता माहीत नाही ?
त्याग, चाकरी, प्रेम बन्धने
हेच मूल्य परी तिचे पाळणे !

मातेवाचून, पत्नीवाचून,
कन्ये किंवा शिष्येवाचून
सांगा सांगा पुरूषजनांनो
क्षणभर तरी तुम्ही पहाच साधून !

चार दोन ही रूपे दाखला
अशी दिली वर तुम्हालागून
कैक अशी ती रूपे स्त्रीयेची
पृथ्वी माता आहे रक्षून !!




प्रभा. प्रभुदेसाई- चेन्नई
prabhapd@gmail.com


# तिच्यासाठी..

मी तुझा स्वप्नातली राणी,
मी तुझी पंखुडी, परी आहे..
मी तुझा निरंतर ध्यास,
मी तुझी दुनिया सारी आहे..

मी अजबगजब रसायन,
मी रेशमाची श्रृंखला आहे..
मी वाळूचा प्रत्येक कण,
मी मोती लपवणारा शिंपला आहे...

मी कातरवेळचा उसासा,
मी पहाटेची भूपाळी आहे..
मी हरवलेले प्रेम सुद्धा,
मी मांगल्य कपाळी आहे...

मी आदी आहे तो परमात्मा,
मी रुद्राच्या धूनिचा अंत आहे,
मी आहे सर्वस्व विश्वाचे,
पण मजला तुझीच भ्रांत आहे....


संहिता हिस्वनकर
- औरंगाबाद
samhita.hiswankar@gmail.com


ई साहित्य प्रतिष्ठान तर्फे जागतिक महिला दिनाच्या..हार्दिक शुभेच्छा !!

स्त्री" शब्दाचा कुठे उल्लेख आला कधी

तर मला तेव्हां..........
माझी आई आठवते
माझी ताई आठवते
माझी आजी आठवते
माझी जिवनसाथी आठवते
माझं गोंडस फूल आठवते
नाही कोणती बाई आठवते

स्त्री शब्दाचा कुठे उल्लेख आला कधी
तर मला तेव्हां..........
माझ्या आईची ऊबदार कूशी आठवते
तिच्या मांडीची कापसासारखी ऊशी आठवते
नाही कोणत्या मधाच्या पोळ्याभोवती
घिरट्या घालणारी मधमाशी आठवते
स्त्री शब्दाचा कुठे उल्लेख आला कधी
तर मला तेव्हां..........

माझ्या ताईचं रुसणं फुगनं आठवते
तिचं ते तासनतास सजणं आठवते
मनगटावर बांधलेली ताकत आठवते
नाही आडोश्याचं खोटं लाजणं आठवते

स्त्री शब्दाचा कुठे उल्लेख आला कधी
तर मला तेव्हां..........
आजीचं थोपटवत, थोपटवत अंगाई आठवते
तिच्या मुखातून निघालेली मधूर वाणी आठवते
त्या गोष्टी, ते सूविचार, ती देवपूजा
नाही रस्त्यावरच्या दिव्याखालची कहाणी आठवते

स्त्री शब्दाचा कुठे उल्लेख आला कधी
तर मला तेव्हां..........
सातफेऱ्यांची माझ्यासवे घेतलेली निष्टा आठवते
माझ्या स्वप्नाला आकार देण्याची जिद्द आठवते
माझ्या ओंजळीत समर्पीत केलेलं फूलं आठवते
नाही वासनेच्या पापाचं बेवारस मुलं आठवते
स्त्री शब्दाचा कुठे उल्लेख आला कधी
तर मला तेव्हां..........

माझ्या चिमची झाकलेली मूठ आठवते
तिच्या डोळ्यातील निरागसता आठवते
तीचा विचार करता करता, मन पुन्हा मला
आई, ताई, आजी, पत्नीकडे पाठवते

सनिल पांगे- मुलुंड
sanilpange@gmail.com

# झाड

तू हुंकारांना ' हो ' म्हणतेस
कातरवेळी हळवी होतेस ....

निरांजन तेवत ठेवतेस
रात्रंदिवस देव्हाऱ्यात,
कधी रात्री-अपरात्री आलीच जाग तर
तेल-वातीची खात्री करूनच
आभाळाला डोळे देतेस.

हसतेस अशी की...
संध्याकाळ दाटून येते मनात.
आणि रडतानाही
... स्फुंदण्याच्या पलीकडे
... आक्रोशाच्या अलीकडे ....
कुठेतरी उभी असतेस तू .

तुझे डोळे तेंव्हा
निरांजनातल्या तेलाने
डबडबलेले असतात....
आणि खरं सांगू ....
त्यावेळी मला ना
कापरासारखं जळायला होतं.

तू पाजळतेस् पलिते
आंबेचे ... तुळजाईचे ...
आणि अंगणात
धूळ उडू नये म्हणून ...
सडा-सरवण करतेस
रोजची रोज .

तू सांभाळतेस घर ....
की घरच सांभाळतं तुला....
हा असला संभ्रम आताशा
मला छळत नाही कधीच.

कारण मला कळू लागलंय हळूहळू ....
तू झाड आहेस ...
काट्याकुट्यांचं.....सावलीचं....
बाहुलीचं ..... माऊलीचं ...
पानांचं.....कळ्यांचं .....
फुलांचं....फळांचं ....

आणि एकूणच
धीरोदात्त मातीत
खोलवर रुजलेल्या
पक्क्या मुळांचं .

तू झाड आहेस ....
तू झाड आहेस .....!!

गजानन मुळे -सोलापुर
Mulegajanan57@gmail.com



ई साहित्य प्रतिष्ठान तर्फे जागतिक महिला दिनाच्या..हार्दिक शुभेच्छा !!

'शापित आयुष्य....'

कित्येक वर्ष गेली
अजून किती वर्ष जातील
कोणास ठावूक ???
किती वेदना घेवून
अजून जगणार
कोणास ठावूक ???
किती नोंदी नोंदवल्यात
काळाच्या डोक्यावर
किती जखमा गोंदवल्यात
या कोवळ्या मनावर
किती ठिगाळ लावलेत
फाटलेल्या काळजाला....
कधी सुरुवात झाली,
शेवट कुठे....
कोणास ठावूक???
रोज रोज कितीदा तरी मरते
आणि मारते मलाच
रोज कितीदातरी....
कधी संपेल हा वनवास
कोणास ठावूक???
आणखी किती मरतील
गर्भातल्या गर्भात........
आणि किती जन्माला आल्यावर
कोणास ठावूक???
किती चुरगळतील
वासनेच्या विळख्यात ....
आणखी किती सापडतील
गावाबाहेरच्या कचर्यात
कोणास ठावूक........???

किती झिजतील संपतील
संसार सावरताना
किती चिरडल्या जातील
आणि किती हुंडाबळी जातील
कोणास ठावूक???
किती अंधारात टाहो फोडतील
किती सापडतील लाल बत्तीच्या
उजेडात

आणि किती करतील आत्महत्या
कोणास ठावूक???
रोज रोज कितीदा........
डोळ्यादेखत पाहते.
माझ्यातल्या माझे पणाची,
क्रूर हत्या.... आणि भोगतीय
गेले कित्येक जन्म.....
"स्त्री" असल्याची वेदना
एक 'शापित आयुष्य....'
न संपणारे.............
आणि .........
पाहतीय वाट,
" उःशापाची"

मनिषा नाईक - पुणे
nmani15@gmail.com



तेंव्हा त्यांना कळलं स्त्री काय असते.
कुठे शिकलीस तू असं वळवाच्या पावसासारखं मुक्त बरसायला
जगण्याच्या प्रत्येक क्षणी ,
तुला अबला गृहित धरल्याने
पेटला का तुझ्या मनातला शान्ततेचा समुद्र,
आणि त्याची वाफ़ गगनात भिडून बनली
या पावसाचा काळाकुट्ट ढग,
की वर्षानुवर्षाचं अव्यक्त मन
बनून राहीलं एक कोंदट मळभ
स्वतःतच घुसमटून आभाळभर साठताना.
शेवटी असह्य झालं सारंच आणि तू मुक्त बरसलीस.
तुझ्या रागाच्या बरसण्यातूनही जेंव्हा उमलली कोवळी फुलं
तेंव्हा त्यांना कळलं स्त्री काय असते.

हर्षदा सौरभ - पुणे kavyarth@gmail.com

ती .....आज तिने हातात लेखणी घेतली
थोडस स्त्रीत्वावर लिहायला
स्वतालाच न उमगलेली ती
बसली हिशोब लावत
एका एका क्षणाचा अन
झालेल्या प्रत्येक अन्यायाचा
तरीही नाही उमगली तिलाच ती
ओरबाडलेल्या प्रत्येक खुनांबरोबर
झाली रक्तबंबाळ मग
उभी राहिली स्वतःच धडपडत
पुढे पुढे जाण्यासाठी
दाबून टाकले प्रत्येक हुंदके
खिदळू लागली परिस्थितीवर
तरीही नाही उमगली तिलाच ती

अनघा हिरे - नाशिक
anagha.hiray@gmail.com



ई साहित्य प्रतिष्ठान तर्फ़े जागतिक महिला दिनाच्या..हार्दिक शुभेच्छा !!

# स्त्री

इवल्या मुठीत आभाळ भरून
अंगणात नक्षत्रांची पखरण करते.
चिमुकल्या पावलांनी दुडूदुडू धावताना
झुळूझुळू वाहणारा झरा होते.

कधी जिवाभावाची सखी होऊन
विश्वासाच्या हिंदोळ्यावर झोके देते.
कधी रुसते, कधी रागावते,,
तरी वाटेत रेशमाच्या पायघड्या अंथरते.

आभाळाइतकी माया मनगटावर बांधताना
आनंदाचे अश्रूही नेटाने परतवते.
भरल्या डोळ्यांनी आशीर्वाद देऊन
त्याचा मोबदलाही मिळवून घेते.

उंबरठा ओलांडून सौभाग्यवती झाल्यावर
दुधात मिसळलेलं केशर होते.
उबदार मिठीचं पांघरूण घालून
ग्रीष्मातही बरसणारी श्रावणसर होते.

गर्भार स्वप्नं उदरी रुजताना
पान्हा फुटून हिरवीगार होते.
इवला अंकुर कुशीत उमलतो
तेव्हा नसानसातून आईपण मिरवते.

सुरकुतल्या हातांनी माया करताना
दुधावरच्या साईसारखी जपत राहते.
पिलू घरट्यातून उडून जाताना
हळूच पदराने डोळे पुसते.

प्रत्येक नात्यात समरसून जाताना
पाण्यात मिसळलेला रंग होते.
कधी पालवी, कधी पाकळी,
तर कधी सावली देणारा वटवृक्ष होते.

संचिता कारखानीस. - डोंबिवली




# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षापूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेलं ई-श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्ल्यांची माहिती देणा-या पुस्तिका “दुर्ग दुर्गट भारी” द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली. लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाखभर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही. आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२ लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

तर होणार ना ई-साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे ??

फक्त आपल्या खास मराठी मित्र, नातेवाईकांच्या १२ मेल आयडी खालील पत्त्यावर पाठवा.

✉

esahity@gmail.com

खात्री बाळगा या मेल आयडीचा कोणत्याही प्रकारे गैरवापर केला जाणार नाही. जाहिराती अथवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. याचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

:अधिक माहितीसाठी :

संकेत स्थळ

www.esahity.com

फेसबुक

https://www.facebook.com/esahity

नेटाक्षरीच्या या अंकासाठी प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणे मदत केलेल्या दोस्तीचे सर्व कवी लेखकांचे आभार !!



धन्यवाद !!